**सेवेत पुन:स्थापित करण्याबाबत:**

श्री. जगदीश देशमुख, निरीक्षक (गट-ब),
राज्य उत्पादन शुल्क.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्रमांक : इएसटी-५०१५/प्र.क्र.१४०/राऊशु-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १५ मे, २०१७.

वाचा : १) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आदेश क्र. इएसटी ११२०१५/ मालवणी दुर्घटना/ प्रदक-१०, दि. १९.०६.२०१५.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. निप्रआ-११११/ प्र.क्र.८६/ ११-अ, दि. १४.१०.२०११.
३) गृह विभाग, शासन ज्ञापन क्र. इएसटी- २०१५/ प्र.क्र. १४०(१) / राउशु-१, दि. २२.०३.२०१७.

**शासन आदेश:-**

दि. १८.०६.२०१५ रोजी मुंबई उपनगर जिल्ह्यातील ज्युरासिक पार्क जवळील झोपडपट्टी, खारोडी, गांवदेवी मंदिर रोड, मालवणी, मालाड (पश्चिम), मुंबई या भागात विषारी रासायनिक द्रव्य मिश्रित गावठी दारू प्राशन केल्यामुळे मोठ्या प्रमाणावर विषबाधा होउन सुमारे १०४ व्यक्तींचा मृत्यू झाला होता. हे क्षेत्र निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, यु विभाग, मुंबई उपनगर यांच्या कार्यक्षेत्रात येत असल्यामुळे या क्षेत्रात कार्यरत श्री. जगदीश देशमुख, निरीक्षक, राउशु, यु विभाग, मुंबई उपनगर यांना आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी संदर्भ क्र. (१) येथील दि. १९.०६.२०१५ च्या आदेशान्वये निलंबित केले आहे. सदर अधिकाऱ्याच्या निलंबनास १ वर्ष ११ महिने इतका कालावधी झालेला असून सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. (२) येथील दि. १४.१०.२०११ च्या शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेता प्रस्तुत प्रकरणातील निलंबन आदेश रद्द करण्यासाठी सदरचे प्रकरण निलंबन आढावा समिती समोर सादर करण्याची आवश्यकता नाही.

राज्य उत्पादन शुल्क विभागातील निरीक्षक हे गट-ब दर्जाचे पद असून सदर पदाचे नियुक्ती प्राधिकारी शासन आहे. सबब, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ४ (५) (क) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन, सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, प्रस्तुत प्रकरणातील निलंबित श्री. जगदीश देशमुख, निरीक्षक, राउशु, यु विभाग, मुंबई उपनगर यांच्याविरुद्ध संदर्भ क्र. (३) येथील दि. २२.०३.२०१७ च्या ज्ञापनान्वये सुरु असलेल्या विभागीय चौकशीच्या अधीन राहून त्यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांना शासन सेवेत पुर्नस्थापित करण्यात येत आहे. त्यांच्या पदस्थापनेबाबत स्वतंत्ररित्या कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०५१५१२१४५६८४२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip J Shedmekhe

Digitally signed by Dilip J Shedmekhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5c22eb48b36977859e2ada92f034598cc0bc8511f0527da968636a6b9d9e10f0, serialNumber=5603a72ffdb1ef7b928b7c0a641bd1c8ef4b36aa6a8fd21a86271888a24f9803, cn=Dilip J Shedmekhe
Date: 2017.05.15 12:20:42 +05'30'

**(दि. ज. शेडमेखे)**

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. विभागीय उपआयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, कोकण विभाग, ठाणे.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई उपनगरे.
५. अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई उपनगरे
६. संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राउशु, मुंबई.)
७. निवडनस्ती (राउशु-१)

**प्रत माहितीस्तव**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.